**ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत प्राथमिक शाळा व आंगणवाड्यांना पाणी पुरवठा उपाययोजना घेण्यासाठी खर्चाच्या मर्यादेस मुदतवाढ देण्याबाबत..**

**----------------------------------------**

# महाराष्ट्र शासन

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन परिपत्रक, क्रमांक ग्रापाधो-११११/प्र.क्र.०१०/पापु-०७**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक : १६ मार्च, २०११**

**वाचा:** १) शासन परिपत्रक, पापुवस्ववि क्र.ग्रापाधो-११०८/प्र.क्र.३२/पापु-०७, दि.२२ मे,२००८.

**प्रस्तावना**:

संदर्भाधीन शासन परिपत्रकान्वये, भारत निर्माण कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचना देण्यात आल्या होत्या. या सूचनांमधील मुद्दा क्र.०९ अन्वये, राज्यातील शाळा अंगणवाड्यांमधील पिण्याच्या पाण्याचा प्रश्न शीघ्र गतीने सोडविण्यासाठी सदर कामासाठी असलेली रु.३०,०००/- पर्यंतच्या खर्चाची मर्यादा रु.६०,०००/- पर्यंत वाढविण्यात आली होती. मात्र, या शासन परिपत्रकातील सूचना ह्या केवळ मार्च,२००९ पर्यंत लागू असल्याने, सद्यस्थितीत नियमित मर्यादेत शाळा व अंगणवाड्यांमध्ये पिण्याच्या पाण्याच्या सुविधा घेण्यामध्ये अडचणी येत असल्याची बाब क्षेत्रीय कार्यालयांकडून शासनाच्या निदर्शनास आणण्यात येत होती.

ही बाब विचारात घेऊन, राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत, शाळा व अंगणवाड्यांमध्ये पिण्याच्या पाणी पुरवठा सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी, खर्चाच्या मर्यादांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत, शाळा व आंगणवाड्यांमध्ये पिण्याच्या पाणी पुरवठा सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी घ्यावयाच्या उपाययोजनांसाठी येणारा वाढीव खर्च विचारात घेऊन, या खर्चाच्या मर्यादेस मुदतवाढ देण्याचे अनुषंगाने पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१. ग्रामीण भागामध्ये शाळा व अंगणवाड्यांमध्ये पिण्याच्या पाणी पुरवठा सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी घ्यावयाच्या उपाययोजनांसाठी करावयाच्या खर्चाची मर्यादा अपवादात्मक परिस्थितीत रु.६०,०००/- इतकी करण्यात येत आहे. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांनी वाढीव खर्चाचे समर्थन केल्यानंतर, व अधिक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष यांनी शिफारस केल्यानंतर मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी या प्रस्तावांना मान्यता द्यावी.

२. अधिक्षक अभियंता, राज्यस्तरीय भारत निर्माण कक्ष यांनी या वाढीव खर्चाच्या प्रकरणांचा अहवाल सर्व विभागीय भारत निर्माण कक्षांकडून अहवाल उपलब्ध करुन घ्यावा.

३. उपरोक्त वाढीव खर्चाच्या मर्यादेची मुदतवाढ राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत हाती घेतलेल्या व घ्यावयाच्या योजनांसाठी लागू राहणार असून ती मार्च, २०१२ पर्यंत अंमलात राहील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०११०३१६१६५५०७००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
**(प्राजक्ता लवंगारे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,
मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव
विभागीय आयुक्त (सर्व)
सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
**सर्व** मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
**सर्व** जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
**सर्व** अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
**सर्व** कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद
महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
महालेखापाल, महाराष्ट्र -२ नागपूर (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,नवी मुंबई
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,नाशिक, पुणे,औरंगाबाद, अमरावती व नागपूर
**सर्व** प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
**सर्व** प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
**सर्व** जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
**सर्व** कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
मंत्रालयातील इतर सर्व विभाग,
पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने
निवडनस्ती, कार्यासन क्रमांक पापु-०७